शासकीय व इतर कर्मचा-यांच्या सुधारित वेतनश्रेणीतील असमानता दूर करुन सुधारित वेतनश्रेणींची शिफारस करण्याकरिता वेतन असमानता समितीची नियुक्ती

# महाराष्ट्र शासन,

## वित्त विभाग,

शासन निर्णय क्रमांक : वेपुर १२०१/प्र.क्र.४/२००३/सेवा-९
दिनांक : ३ नोव्हेंबर २००३.

पहा :-
(१) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांक : वेपुर १२९८/प्र.क्र.१३/९८/सेवा-१०, दिनांक १० डिसेंबर १९९८
(२) अर्धशासकीय पत्र क्रमांक : वेपुर १२०१/प्र.क्र.४/सेवा-९, दिनांक २९.५.२००३.
(३) अर्धशासकीय पत्र क्रमांक : वेपुर १२०१/प्र.क्र.४/सेवा-९, दिनांक ११.७.२००३.

## शासन निर्णय

पाचव्या केंद्रीय वेतन सुधारणेच्या अनुषंगाने शासकीय कर्मचा-यांना उपरोक्त दिनांक १० डिसेंबर १९९८ च्या शासन अधिसूचनेन्वये दिनांक १ जानेवारी १९९६ पासून सुधारित वेतनश्रेणी विहित करण्यात आलेल्या आहेत. या सुधारित वेतनश्रेणींमध्ये काही त्रुटी राहण्याची शक्यता लक्षात घेऊन, त्या त्रुटींचे निराकरण करण्यासाठी शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत पाचव्या केंद्रीय वेतन सुधारणेच्या अनुषंगाने विहित करण्यात आलेल्या सुधारित वेतनश्रेणींमधील त्रुटींचे निराकरण करुन त्यांना पाचव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने सुधारित वेतनश्रेणींची शिफारस करण्याकरिता पुढीलप्रमाणे वेतन असमानता समिती नियुक्त करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| (१) | प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| (२) | प्रधान सचिव (सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |

या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

१) राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचा-यांना पाचव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने विहित केलेल्या परंतु श्री. श. गं. काळे, सेवानिवृत्त अप्पर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यात आलेल्या 'वेतन त्रुटी-उच्चस्तर समिती' समोर सादर करण्यात आलेल्या प्रस्तावांव्यतिरिक्त सदर समितीने घालून दिलेल्या मुदतीत आपल्या विभागाच्या अधिपत्याखालील पदाच्या वेतनश्रेणीतील असमानता दूर करण्यासंबंधीचे प्रस्ताव वेतन त्रुटी-उच्चस्तर समितीस सादर न करता आल्यामुळे, समितीने असे प्रस्ताव विचारात घेतलेले नाहीत किंवा अन्य कारणामुळे असे प्रस्ताव वेतन त्रुटी-उच्चस्तर समितीसमोर सादर करण्याचे राहून गेले असल्यास सुधारित वेतनश्रेणीमधील त्रुटींचे परिक्षण करुन योग्य सुधारित वेतनश्रेणींची शिफारस करणे.

२) मा.मुख्यमंत्री व मंत्रिमंडळाने निर्णय घेऊन समितीकडे सोपविलेल्या विनिर्दिष्ट प्रस्तावांबाबत शिफारस करणे.

३) समितीने नियुक्तीच्या दिनांकापासून तीन महिन्यांत आपला अहवाल शासनास सादर करावा. या कामाकरिता समिती आपली स्वत:ची कार्यपध्दती स्वतः ठरवील.

४)  मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ३ एप्रिल २००३ च्या निर्णयानुसार, सुधारित वेतनश्रेणीत असमानता (Disparity) असल्यास तत्सबंधीचे प्रस्ताव एकत्रितरित्या मंत्रिमंडळास सादर करण्याची मुदत २३ सप्टेंबर २००३ पर्यंत होती. सदर मुदत समितीच्या कार्यकालाच्या अनुषंगाने सहा महिन्यांनी वाढविण्यात आली असून, **आता शासनास दिनांक २२ मार्च २००४ पर्यंत अहवाल सादर करण्यात येईल.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

अ.कु.दौ.जाधव
प्रधान सचिव (वित्त )

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव/उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व कुल सचिव, कृषि/अकृषि विद्यापीठे,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसच्र युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग),
खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-९

-------

* पत्राद्वारे.